आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील असलेली उपसंचालक स्तरावर वर्गीकरण केलेली आरोग्य वैद्यकीय अधिकाऱ्यांची ५४५ अधिसंख्य पदांपैकी आता प्रवेशित असलेली २५५ वैद्यकीय अधिकारी यांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र.६३/पासु-२**
**१० वा मजला, संकुल इमारत,**
**गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई**
**तारीख: १३ जून, २०२५.**

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक पदनि-२०१५/प्र.क्र.४४१/सेवा-३ दिनांक १४.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.०१/सेवा-३ दिनांक ०८.०४.२०२२
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक अपदे-२०२२/प्र.क्र.७१/आरोग्य-३ दिनांक १२.०६.२०२३
४) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक अपदे-२०२३/प्र.क्र.७१/आरोग्य-३ दिनांक ०८.१२.२०२३.
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : अपदे-२०२४/प्र.क्र.६३/आरोग्य-३अ, दिनांक ०५.०३.२०२४.
६) सह संचालक, (अर्थ व प्रशासवन) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- आसेआ/पीजीसेल/५४५ पेक्षा जास्त वाढीव अधिसंख्य पदांचा प्रस्ताव/न.क्र.४/७६३/२०२५, दिनांक १५.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील ५४५ वैद्यकीय अधिकारी यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. तसेच सदर पदांना अनुक्रमांक-५ येथील शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदांना दि. २९.०२.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर मुदतवाढ संपुष्टात आली आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थेपनावर कार्यरत वैद्यकीय अधिकारी यांनी पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतल्याने त्यांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी ५४५ अधिसंख्या पदांची निर्मिती करण्यात आली होती. सदर ५४५ पदांच्या जागेवरील केवळ २७२ वैद्यकीय अधिकारी पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी प्रवेशित असल्याने सदर पदांना अनुक्रमांक-५ येथील शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदांना दि. २९.०२.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आली आहे. सदर २७२ अधिसंख्य पदांपैकी १७ वैद्यकीय अधिकारी परीक्षा उत्तीर्ण झालेले असल्याने उर्वरित पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी या अगोदरच प्रवेशित असलेले २५५ वैद्यकीय अधिकारी यांच्यासाठी असलेल्या अधिसंख्य पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि. २८.०२.२०२६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली २५५ अधिसंख्ये पदे सबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांचे अभ्यासक्रम पूर्ण झाल्याच्या दिनांकानंतरच्या दिनांकास ०१.०३.२०२६ रोजी संपुष्टात येतील.

३. सदर पदावरील खर्च, मागणी क्रमांक:- आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(०४) गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) (०१) वेतन" या लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च हा त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती ई-ऑफीस क्र.१०९३२२८ वर वित्त विभागाने दिनांक १२.०६.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१३१५००५२६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: cn=MAHESH MADHUKAR LAD, o, ou, email=maheshlad@nic.in, c=US
Date: 2025.06.13 17:02:46 +05'30'

( महेश लाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२) आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

३) सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) आरोग्य भवन, मुंबई
४) सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ
५) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७) कक्ष अधिकारी वित्त विभाग (आपुक कक्ष) मंत्रालय, मुंबई
८) सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन-सेवा-२,/अर्थसंकल्प)
९) निवडनस्ती (पासु-२).